पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजनेंतर्गत राष्ट्रीयीकृत बँकेत ESCROW बँक खाते सुरु करणे.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एबख-२०२५/प्र.क्र.७२/२ अे,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०६ जून, २०२५.

**वाचा :-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. फवियो-२०२४/प्र.क्र.८१/१०-अे, दि.१२.६.२०२४
२) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना, दि.६.११.२०२४
३) केंद्र शासनाच्या ESCROW खाते उघडणे बाबत सूचना, दि.१.४.२०२५
४) केंद्र शासनाचे ESCROW खाते उघडणेबाबतचे पत्र क्र.१३०१२/०३/२०२१-क्रेडीट-II-पार्ट(२)-एफटीएस-१५९८७७, दि.११.४.२०२५
५) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/ मुसां./ पुहाआफपिवियो/ अ.मा./ २०२५/ १०४२६, दि.८.५.२०२५
६) केंद्र शासनाचे पत्र क्र. ११०१९/०१/२०२२-सीआर-II/एफटीएस-१११८७५,दि.२७.५.२०२५
७) संचालक(कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/मुसां./पुहाआफपिवियो/ अ.मा./ २०२५/१२६२३, दि.२.६.२०२५

**प्रस्तावना :-**

पुनर्रचित हवामान आधारीत फळपिक विमा योजना सन २०२४-२५ ते २०२५-२६ या कालावधीमध्ये मृग व आंबिया बहारातील अधिसूचित फळपिकांकरीता राबविण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर शासन निर्णयानुसार केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार योजनेच्या अंमलबजावणीसाठी अनुदान देयकांचे व्यवस्थापन सुलभ करण्यासाठी ESCROW बँक खाते सुरु करणेबाबतची अट नमूद आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ६ अन्वये योजनेंतर्गत देय विमा हप्ता, ११० % वरील नुकसान भरपाई अदायगी, अतिरिक्त विमा हप्ता व परतावा निधी जमा करणेबाबतचा ताळमेळ व व्यवस्थापन सुलभ होण्यासाठी एकच ESCROW बँक खाते सुरु करण्यास परवानगी दिली आहे. त्यानुसार संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन) यांनी संदर्भ क्र. ७ अन्वये, सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी अनुदान देयकांचे व्यवस्थापन सुलभ करण्याच्या अनुषंगाने, विमा कंपन्यांना विमा हप्ता अदा करणे, ११० % वरील नुकसान भरपाईची रक्कम वितरीत करणे, विमा कंपन्यांकडील अधिकचा विमा हप्ता व ८०:११० मॉडेलनुसार विमा कंपन्यांकडून राज्य शासनास येणारी परतावा रक्कम ESCROW बँक खात्यात जमा करणे तसेच सदरच्या जमा रक्कमेतून विमा कंपन्यांची चालू व पुढील हंगामातील प्रलंबित विमा हप्ता व नुकसान भरपाई रक्कम ESCROW खात्यामार्फत अदा करण्याकरीता राज्य व केंद्र सरकार यांच्या संयुक्त विद्यमाने ESCROW खाते कार्यान्वित करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर राष्ट्रीयीकृत बँकेत ESCROW बँक खाते सुरु उघडण्यास मान्यता देण्याची विनंती केली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या सूचना तसेच कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र. ७ च्या पत्रातील विनंतीनुसार प्रस्तुत प्रकरणी आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर राष्ट्रीयीकृत बँकेत ESCROW बँक खाते सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुनर्रचित हवामान आधारीत फळपिक विमा योजनेच्या अंमलबजावणीसाठी अनुदान देयकांचे व्यवस्थापन सुलभ करण्याच्या अनुषंगाने, योजनेंतर्गत विमा कंपन्यांना विमा हप्ता अदा करणे, ११० % वरील नुकसान भरपाईची रक्कम वितरीत करणे, विमा कंपन्यांकडील अधिकचा विमा हप्ता व ८०:११० मॉडेलनुसार विमा कंपन्यांकडून राज्य शासनास येणारी परतावा रक्कम ESCROW बँक खात्यात जमा करणे तसेच सदरच्या जमा रक्कमेतून विमा कंपन्यांची चालू व पुढील हंगामातील प्रलंबित विमा हप्ता व नुकसान भरपाई रक्कम ESCROW खात्यामार्फत अदा करण्याकरीता राज्य आणि केंद्र सरकार यांच्या संयुक्त विद्यमाने ESCROW खाते कार्यान्वित करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर राष्ट्रीयीकृत बँकेत ESCROW बँक खाते सुरु करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनमान्यता देण्यात येत आहे.

१. केंद्र शासनाच्या निर्देशांनुसार ज्या विशिष्ट प्रयोजनासाठी सदर खाते उघडण्याचे प्रस्तावित आहे, त्याच प्रयोजनासाठी करण्यात यावा.

२. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनासाठी सदर खात्याच्या वापर करण्यात येवू नये.

३. सदर खात्याच्या संदर्भात रोख वही (Cash Book) अद्ययावत ठेवणे अनिवार्य राहील.

४. सदर बँक खात्यातील शिल्लक रकमा समुचित शासनखाती भरणा करणे आवश्यक असल्यास लागू असलेल्या नियम-विनियम यानुसार कार्यवाही करणे अनिवार्य राहील.

५. सदर बँक खात्यातील व्यवहाराचे मासिक ताळमेळ करणे तसेच लेखा परिक्षण अनिवार्य राहील.

६. सदर बँक खात्यात दिर्घकाळ निधी विनावापर पडून रहाणार नाही या दृष्टीने दक्षता घेण्यात यावी.

७. विवक्षित प्रयोजन संपुष्टात आल्यानंतर सदर बँक खाते तात्काळ बंद करणे आवश्यक राहील.

८.सदर बँक खात्याच्या संदर्भात महाराष्ट्र कोषागार नियम,१९६८ मधील नियम क्र. (३), (८), (१३) व (१५) तसेच मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम ७ अन्वये विहित केलेल्या तरतूदींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

९. वित्त विभाग, कोषा प्रशा-५ कार्यासनाच्या दि.०३.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील आणि दि. २५.०६.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

१०. वित्तीय औचित्याची सूत्रे आणि वित्तीय शिस्तीचे काटेकोर पालन करावे.

२. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०३/२०२५/कोषा-प्रशा-५, दि.०६.०६.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०६१९३६१७०९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KARAD SANTOSH BANSIRAO

Digitally signed by KARAD SANTOSH BANSIRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agriculture and ADF Department, 2.5.4.20=F981D5A9FEC2E5D5DC36F39695B5F0E4FF5B340CD5420DF7CBAA28990D692E36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=KARAD SANTOSH BANSIRAO
Date: 2025.06.06 19:37:12 +05'30'

**(संतोष कराड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन .**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.

२. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. उप सचिव (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
५. उप सचिव (११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
६. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. मुख्य सांख्यिकी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
९. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१२. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई- ३२
१३. अवर सचिव (११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१४. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, लोक चेंबर्स, मरोळ मरोशी नाका, मरोशी. अंधेरी(पूर्व), मुंबई - ५९.
१५. निवड नस्ती (कार्यासन २-अे).